**यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक यांचे रत्नागिरी येथील उपकेंद्र व छत्रपती शिवाजी महाराज आंतरराष्ट्रीय ग्रंथालय व संशोधन केंद्र इमारतींचे बांधकाम करण्याकरीता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. भुखंड-२०२१/प्र.क्र.१८/विशि-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २० जून, २०२३.

संदर्भ :- १) विभागाचा समक्रमांकाचा दि.२५.११.२०२१ रोजीचा शासन निर्णय.
२) विभागाचा समक्रमांकाचा दि.२९.०९.२०२२ रोजीचा शासन निर्णय.
३) विभागाचा समक्रमांकाचा दि.१०.०३.२०२३ रोजीचा शासन निर्णय.
४) कार्यकारी अभियंता, उत्तर रत्नागिरी सार्वजनिक बांधकाम विभाग, रत्नागिरी यांचे दि.२८.०४.२०२३ रोजीचे पत्र.
५) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३ दि.१२.०४.२०२३.

**प्रस्तावना :-**

यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक विद्यापीठाची स्थापना महाराष्ट्र विधी मंडळ कायदा क्र.२० अन्वये दि.०१.०७.१९८९ रोजी झाली आहे. विद्यापीठ अनुदान आयोगाची मान्यता असलेल्या या विद्यापीठाचे कार्यक्षेत्र संपूर्ण महाराष्ट्र राज्य आहे. कोल्हापुर विभागातंर्गत रत्नागिरी व सिंधुदुर्ग या दोन जिल्ह्यांसाठी विद्यापीठाचे उपकेंद्र व छत्रपती शिवाजी महाराज आंतरराष्ट्रीय ग्रंथालय व संशोधन केंद्र इमारत बांधकामासाठी रु.१२३९.४३ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. याकामाकरीता संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये रु.६०.०० लक्ष एवढा निधी वितरीत करण्यात आला होता. तथापि, या उपकेंद्रासाठी जागा निश्चित न झाल्याने सदरहू निधी शासनास समर्पित करण्यात आला आहे. आता या उपकेंद्राची जागा संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केली आहे. सदरहू जागेवर बांधकाम तातडीने पूर्ण होण्यासाठी निधी वितरीत करण्याची संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये विनंती केली आहे. तद्नुषंगाने संदर्भ क्र.५ येथील परिपत्रकास अनुसरुन या बांधकामास निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक यांचे कोल्हापूर विभागातंर्गत रत्नागिरी व सिंधुदूर्ग या दोन जिल्ह्यासाठी उपकेंद्र व छत्रपती शिवाजी महाराज आंतरराष्ट्रीय ग्रंथालय व संशोधन केंद्र इमारतींच्या बांधकामासाठी रु.२,००,००,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी फक्त) इतका निधी खालील अटींच्या अधिन राहून मंजूर करण्यात येत आहे.

१. हा निधी प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेतच वितरीत तथा आहरीत करण्यात यावा.
२. चालू आर्थिक वर्षात विधीमंडळाच्या निदर्शनास आणलेल्या कामनिहाय तरतूदीपेक्षा जादा खर्च करण्यात येऊ नये.
३. कोणत्याही परिस्थितीत संबंधित अधिक्षक अभियंता यांनी प्रशासकीय मान्यतेच्या रकमेपेक्षा जास्त खर्च कामांवर करु नये.
४. संबंधित कार्यकारी अभियंता यांनी कामाची प्रगती व झालेला खर्च याचा अहवाल संबंधित विद्यापीठाचे कुलसचिव व संचालक, उच्च शिक्षण यांच्याकडे पाठविण्याची व्यवस्था करावी.
५. विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही. या दृष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. हा निधी सार्वजनिक बांधकाम विभागाने विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन वितरीत करावा. निधी वितरीत करतांना वरील अटी व शर्ती विचारात घ्याव्यात. तसेच वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल-२, नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीकरीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत.

३. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा. तसेच विहीत कालावधीमध्ये सदरचा खर्च पूर्णपणे करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी आणि त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत शासनास विहित वेळेत सादर करण्यात यावे.

४. सदरहू बांधकामावर होणारा खर्च "मागणी क्रमांक - एच-८, मुख्य लेखाशिर्ष- ४२०२ शिक्षण, सर्वसाधारण शिक्षण २०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण (४२०२००७९) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२०२४ मधील मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२३, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/अर्थ-३ दि.१२.०४.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. या शासन निर्णयातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०६२११५४१२१३१०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SHARAD
SARJEROA KOKATE

Digitally signed by SHARAD SARJERAO KOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=be7c6620763057633615219 44ed5ba258ae7d29f78cddb94fc3e83bfa2424200, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=95D25EC736C5F76DA241E96AD9552FF908EFC6582DF4A4ECADD1C4C6CD038195, cn=SHARAD SARJERAO KOKATE
Date: 2023.06.21 15:43:20 +05'30'

**( शरद कोकाटे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपाल तथा कुलपती यांचे उपसचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. कुलगुरू, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक
४. प्रधान सचिव (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (व्यय) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. उप सचिव (विशि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
८. कुलसचिव, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक.
९. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) / लेखापरीक्षण, महाराष्ट्र-१/२ मुंबई / नागपूर.
१०. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, रत्नागिरी.
११. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, रत्नागिरी.
१२. कार्यासन अर्थसंकल्प-२, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती (विशि-२).